**मा. अध्यक्षा, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांच्याकरीता वाहन खरेदी करण्याास मंजूरी देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- मप्रन्या -२०२४/प्र.क्र.२२/मप्रन्या**
मादामा कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक :- ४ मार्च, २०२५

**संदर्भ :-** १. सामान्य प्रशासनविभागाचा शासन निर्णय संकीर्ण ११०९/प्र.क्र.३३८/०९/१९-अ, दि. २७ सप्टेबर,२०१९

२. सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय मप्रन्या २०१४/प्र.क्र.११३/३८, दि. ११ फेब्रुवारी,२०१९

३. सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय मप्रन्या २०१४/प्र.क्र.१३०/३८, दि.३ ऑक्टोबर,२०१९४

४. वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक वाहन-२०२४/प्र.क्र.११/विनियम, दि. २.०२.२०२४

**प्रस्तावना:-**

मा. अध्यक्षा, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांच्याकरीता नविन वाहन खरेदी करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. संदर्भ क्र.४ येथील दिनांक ०२.०२.२०२४ च्या शासन निर्णयानुसार मा. अध्यक्षा, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई यांना सदर शासन निर्णयातील अनुक्रमांक २ नुसार रु.२५,००,०००/- किंमत मर्यादेत वाहन अनुज्ञेय आहे. सदर निश्चित केलेल्या वाहन किंमत मर्यादेत वस्तू व सेवा कराचा अंतरभाव करण्यात आलेले नाही. तथापि, सदर किंमतीमध्ये वाहनाच्या किंमतीसोबत टेंम्परिरी रजिस्ट्रेशन चार्जेस व सहाय्यभुत साहित्य (Accessories) इत्यादीसाठींच्या खर्चाचा अंतर्भाव करण्यात आलेला आहे.

मा. अध्यक्षा यांना नागपूर व औरंगाबाद येथील खंडपीठात सुनावणीसाठी उपस्थितीत रहावे लागते. यास्तव सदर वाहन इलेक्ट्रीक वाहनातून सूट घेण्यास पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाने मान्यता दिलेली आहे.

२. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र. ८२/भाग-III/उद्योग-४, दि.०१.१२.२०१६ व क्र. संकिर्ण-२०१६/प्र. क्र. २१५/उद्योग-४, दि. २४.०८.२०१७ मधील तरतुदींनुसार वाहन खरेदी गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (Government e-Marketplace- GeM) पोर्टलवरुन विहीत पद्धतीचा अवलंब करून करण्यात यावी.

३. वाहन क्रमांक **एमएच-०१ एबी-६६६६** या निर्लेखित वाहनाच्या बदली यापूर्वी नवीन वाहन खरेदी करण्यात आले नाही, या धारणेच्या अधिन राहून तसेच विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन नवीन वाहन खरेदीस शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर वाहन खरेदीकरीता येणारा खर्च मागणी क्र. ए-४ ,२०७० इतर प्रशासकीय सेवा, (००)(०२) महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण (अनिवार्य) (२०७० ०६९३) १३ कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षातून सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता उपलब्ध अर्थसंकल्पीय तरतूदीतून करण्यात यावा. तसेच वितरीत केलेल्या निधिपेक्षा अतिरिक्त खर्च होणार नाही याची दक्षता घ्यावी.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या दि.१७.४.२०१५ च्या शासन निर्णयानुसार वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ उप विभाग-२, अनुक्रमांक १९-ब, नियम क्रमांक ६९ अन्वये राज्य स्तरीय वाहन आढावा समितीस प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर समितीने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३४१/२०२४/विनियम,

दि.१०/०९/२०२४ व अनौपचारीक संदर्भ क्र. ८०/२०२५/कोषा. प्रशा.-५, दिनांक ०३/०३/२०२५ अन्वये दि. १५/०२/२०२५ नंतर खरेदीस दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. नविन वाहन खरेदी करण्यात आल्यानंतर त्वरीत वाहन आढाव्यामध्ये सदर वाहन क्रमांक समाविष्ट करावा.तसेच महावाहन पोर्टल वर त्याची नोंद घ्यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३०४१७३२४२९७०७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KRANTI BHIMRAO PATIL

Digitally signed by KRANTI BHIMRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=82bdf2956da62b4fc2f658725d7587906d3cf8eb3117ad97f90ef418d0d39a41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4CB4EDEE9A9967B63A896631DCC4A6E70FF0378E5AF6387779BF67DE75ED5B49, cn=KRANTI BHIMRAO PATIL
Date: 2025.03.04 17:34:03 +05'30'

**( क्रांती पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महराष्ट्र राज्य १ / २, मुंबई / नागपूर,
३) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, १ / २, मुंबई / नागपूर,
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५) निवासी लेखाधिकारी, मुंबई,
६) वित्त विभाग (व्यय-४, विनिमय, अर्थसंकल्प-९), मंत्रालय, मुंबई,
७) सामान्य प्रशासन विभाग / का.२५, का.१९-अ, मंत्रालय, मुंबई,
८) निवड नस्ती / मप्रन्या, सा. प्र. वि., मंत्रालय, मुंबई.